केंद्र शासन पुरस्कृत पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप योजने अंतर्गत स्थापना करण्यांत आलेल्या "राज्य अंमलबजावणी कक्षास" ११ शिक्षक व शिक्षकेत्तर पदे निर्माण करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

शासन निर्णय क्र.आयटीआय-२००८/(११३ /२००८)/व्यशि-५

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०७ जुलै, २०११.

संदर्भ:- १) डिजीईटी. नवी दिल्ली यांचे पत्र क्र. DGET-35(1396)/Guidelines/2007-NIC, दिनांक ५ नोव्हेंबर २००७

२) शासन निर्णय क्र.आयटीआय-२००७/(१६२/०७)/व्यशि-२, दि.३१.१२.२००७.

३) संयुक्त सचिव समितीच्या दिनांक ०५ मार्च २०११ रोजी झालेल्या बैठकीचे कार्यवृत्त.

४) उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक २९ मार्च २०११ रोजी झालेल्या बैठकीचे कार्यवृत्त.

५) संचालक (प्रशिक्षण) यांचे पत्र क्र.१९/पीपीपी-१३९६/२०१०/१२०, दिनांक २८ जून २०१०.

**प्रस्तावना:-** खाजगी सहभागाद्वारे (Public Private Partnership) १३९६ औ.प्र.संस्थांचा दर्जावाढ करण्याची योजना मा.केंद्रीय वित्त मंत्र्यांनी सन २००७-०८ च्या अर्थसंकल्पिय भाषणाद्वारे प्रस्तावित केली. त्याअनुषंगाने संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णया अन्वये सदरहू योजना राज्यात राबविण्यांस मान्यता देण्यांत आली होती. सदरहू योजने अंतर्गत राज्यातील एकूण २०६ औ.प्र.संस्थांचा समावेश करण्यांत आलेला आहे. ह्या प्रकल्पाच्या अंमलबजावणी व नियंत्रणाकरिता राज्य अंमलबजावणी कक्षात १५ पदांचा आकृतिबंध निर्माण करण्याचा प्रस्ताव संचालक (प्रशिक्षण) यांनी संदर्भ क्रमांक ५ नुसार शासनास सादर केला होता.

२. संयुक्त सचिव समितीच्या दिनांक ०५/०३/२०११ रोजी झालेल्या बैठकीच्या कार्यवृत्ताच्या आधारे उच्चस्तर सचिव समितीने दिनांक २९/०३/२०११ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार एकूण १२ पदे निर्माण करण्यास व त्यापैकी सहसंचालक या पदाच्या निर्मितीचा प्रस्ताव मंत्रीमंडळासमोर ठेवण्यास मान्यता प्रदान केली आहे. त्याअनुषंगाने ११ पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** केंद्र शासन पुरस्कृत पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप योजनेसाठी राज्य अंमलबजावणी कक्ष स्थापन करण्यास खालीलप्रमाणे ११ पदे निर्माण करण्यास या शासन निर्णयद्वारे मान्यता देण्यांत येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | सहाय्यक संचालक (तांत्रिक) (सनियंत्रण व मुल्यांकन / संस्था विकास प्रशिक्षण) | २ | नियमित वेतनश्रेणी रु.१५,६००-३९,१०० (ग्रेड पे ६,६००/-) |
| २ | लेखाधिकारी (वित्त) | १ | नियमित वेतनश्रेणी रु.९,३००-३४,८०० (ग्रेड पे ४,४००/-) |
| ३ | कार्यालय अधिक्षक / कक्ष अधिकारी (कार्यालय सनियंत्रण) | १ | नियमित वेतनश्रेणी रु.९,३००-३४,८०० (ग्रेड पे ४,४००/-) |
| ४ | लघुलेखक (मराठी / इंग्रजी) | १ | कंत्राटी तत्वावर रु.१३,६००/- दर महा ठोक वेतन |
| ५ | वरीष्ठ लिपिक | २ | कंत्राटी तत्वावर प्रत्येकी रु.७,६००/- दर महा ठोक वेतन |
| ६ | कनिष्ठ लिपिक-नि-टंकलेखक | ४ | कंत्राटी तत्वावर प्रत्येकी रु.७,१००/- दर महा ठोक वेतन |
| ७ | डाटा एंट्री ऑपरेटर | | बाह्य यंत्रणेद्वारे (out source) रु.७,६००/- दर महा ठोक वेतन |
| ८ | चतुर्थश्रेणी कर्मचारी | | बाह्य यंत्रणेद्वारे (out source) रु.५,७४०/- दर महा ठोक वेतन |
| | **एकूण** | **११** | |

उपरोक्त राज्य अंमलबजावणी कक्षातील ११ पदे खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून निर्माण करण्यास मान्यता देण्यांत येत आहे. सह संचालक हे पद रु.१२,००० ते रु.१६,५०० (असुधारीत) वेतनश्रेणीत मोडत असल्यामुळे सदर पद मंत्रीमंडळाच्या मान्यतेनंतर निर्माण करण्यांत येईल.

**अटी व शर्ती:-**

१) वरील सर्व ११ पदांचा कालावधी हा योजनेच्या कालावधी पुरताच मर्यादीत राहील. योजनेचा कालावधी संपुष्टात आल्यावर सदरहू पदे आपोआप संपुष्टात येईल.
२) अ.क्र. १ ते ३ येथील पदे प्रतिनियुक्तीने भरण्यांत येतील.
३) उर्वरीत अ.क्र. ४ ते ६ येथील पदे ही कंत्राटी पध्दतीने ठोक मासिक वेतनावर भरण्यांत यावीत. कोणत्याही परिस्थितीत संबंधित कंत्राटी उमेदवारांना शासकीय सेवेत कायम / समायोजन केले जाणार नाही व त्यांना शासकीय सेवेत सामावून घेण्याचा हक्क राहणार नाही. तसेच त्याच संवर्गात नियमित पदावरील शासकीय सेवकास मिळत असलेले नियमित वेतन अनुज्ञेय राहणार नाही. कंत्राटी कर्मचा-यांना शासकीय सेवकांना अनुज्ञेय असलेल्या कोणत्याही सोयी व सवलती उपलब्ध होणार नाहीत.
४) अ.क्र. ७ व ८ येथील पदे बाह्य यंत्रणेद्वारे (Out Source) दरमहा वर नमुद केलेल्या ठराविक ठोक वेतनावर भरण्यांत यावीत.

५) शासनाच्या धोरणानुसार रिक्त पदे कंत्राटी पध्दतीने भरताना मागासवर्गीय, महिला, अपंग इत्यादीसाठी असलेले आरक्षण पाळले जाईल याची नियुक्ती प्राधिका-यांनी दक्षता घ्यावी. आरक्षित पदांवर कंत्राटी नेमणूक दिल्यामुळे संबंधित कंत्राटी कर्मचा-यांना नियमित नियुक्तीचे हक्क राहणार नाहीत.

६) कंत्राटी पध्दतीने नियुक्त करावयाच्या उमेदवारांकडून विहित करारपत्रावर स्वाक्षरी घेण्यांत यावी. करारपत्राचा नमुना सोबत जोडला आहे. करारपत्र रु.२०/- च्या स्टॅम्प पेपरवर करण्यांत यावे.

७) पद निर्मितीसाठी होणारा खर्च पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप योजने अंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त निधीमधून भागविण्यांत यावा.

हा शासन निर्णयास वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.पदनि-२०११/प्र.क्र.६५/११/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ३१ मार्च २०११ अन्वये उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेने निर्गमित करण्यांत येत आहे. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक डब्ल्यु-४,२२३०,कामगार व सेवायोजन,०३,प्रशिक्षण,१०१,औद्योगिक प्रशिक्षण संस्था,०१,पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप योजना,०३, औ.प्र.संस्थेचा दर्जावाढ,२० इतर प्रशासकीय खर्च (उद्दिष्टे) (२२३० ५७४८)" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध निधीतून करण्यात यावा.

हा शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर www.maharashtra.gov.in यावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय सांकेतांक क्रमांक २०११०७०७ १४५६२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(किरण जाधव)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव
सचिव, श्रम व रोजगार मंत्रालय, श्रमशक्ती भवन,भारत सरकार, नवी दिल्ली.
सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सहसंचालक/उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई / पुणे / नागपूर / अमरावती / औरंगाबाद / नाशिक [संचालक (प्रशिक्षण) यांचेमार्फत]
महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
नियोजन / वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन व्यशि-१,२,३,४.
निवड नस्ती/व्यशि-५

**जोडपत्र**

**शासन निर्णय क्र.आयटीआय-२००८/(११३ /२००८)/व्यशि-५**

**दिनांक : ०७ जुलै, २०११ चे सहपत्र.**

**शिक्षक संवर्गात कंत्राटी शिक्षक म्हणून नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांकडून**
**<u>रु. २०/- च्या स्टॅम्प पेपरवर लिहून घ्यावयाचा करारनामा.</u>**

प्रति,

-----------------------------------

-----------------------------------

( येथे नियुक्ती प्राधिका-यांचे पदनाम व पत्ता लिहिण्यात यावा.)

ज्याअर्थी, (या ठिकाणी नियुक्ती प्राधिका-यांचे पदनाम लिहिण्यात यावे) (यापुढे नियुक्ती प्राधिकारी असा उलेख केला जाईल.) यांनी त्यांच्या कार्यालयीन आदेश क्रमांक : ---------------------- दिनांक----------------नुसार श्री/श्रीमती/कुमारी --------------------------राहणार -------------------(यापुढे उमेदवार म्हणून उल्लेख केला जाईल.) यांची नियुक्ती पत्रात नमूद केलेल्या अटी व शर्तीवर-----------पदावर कंत्राटी पध्दतीने -----------या कालावधीसाठी नियुक्ती केली आहे. (यापुढे संबंधित नियुक्ती पत्र असा उल्लेख केला जाईल.)

आणि, त्या अर्थी मी श्री./श्रीमती./कुमारी ---------------------लिहून देतो/देते की : -

१) मला प्राप्त झालेल्या नियुक्ती पत्रातील सर्व अटी व शर्ती मी वाचल्या आहेत आणि त्या मला समजल्या आहेत. त्या सर्व अटी व शर्ती मला मान्य आहेत.
२) जर माझ्याकडून एखाद्या अटी / शर्तीचा भंग झाला तर ----------पदावरील माझी नियुक्ती रद्द केली जाईल, याची मला जाणीव आहे,
३) मी या संदर्भातील सर्व माहिती जाणून घेतल्यानंतर जाणीवपूर्वक व स्वेच्छेने सदर कंत्राटी नियुक्ती स्विकारीत आहे,
४) या कंत्राटी नियुक्तीनंतर मला कायम स्वरुपी नियुक्ती मिळण्याचा हक्क राहणार नाही, तसेच या करारपत्राच्या कालावधीनंतर शासनावर कोणतीही जबाबदारी राहणार नाही व या कंत्राटी सेवेशी निगडित कोणत्याही प्रकारची मागणी मी करणार नाही, अशी या करारपत्राव्दारे हमी देत आहे.
५) माझे कामकाज असमाधानकारक आढळून आल्यास माझी नियुक्ती तात्काळ रद्द करण्यात येईल, याबददल माझी कुठलीही तक्रार राहणार नाही.

श्री/श्रीमती/कुमारी----------------------------------

स्वाक्षरी :

दिनांक :

समक्ष -

१)

२)

( नियुक्ती प्राधिका-यांचे पदनाम) यांच्यासाठी आणि यांच्या वतीने

---------------------------

(नियुक्ती प्राधिका-यांने प्राधिकृत केलेल्या अधिका-यांचे नाव आणि पत्ता)